न्यायसहायक वैज्ञानिक संस्थेच्या पदव्या न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब व वैज्ञानिक सहायक, गट-क या पदासाठीच्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून ग्राहय धरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एफएसएल - ०४१७/प्र.क्र.१०३/पोल-४**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- २८ एप्रिल, २०१७.

संदर्भ :-

१) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक संस्था, मुंबई यांचे जा.क्र.न्यासविसंम/संचालक/२०७/२०१७,
२) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मु.का./११४८-४९/१७, दि.२३.२.२०१७, दि.८.२.२०१७,
३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.एनजीसी २००९/(७७/०९)/मशि ३, दि.३०.३.२००९.

प्रस्तावना :-

संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब आणि वैज्ञानिक सहायक, गट-क या पदांच्या सेवाप्रवेश नियमात नमूद असलेल्या शैक्षणिक अर्हतेस उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या न्यायसहायक वैज्ञानिक संस्थेची न्यायसहायक विज्ञान या विषयातील पदव्युत्तर पदवी, न्यायसहायक विज्ञान शाखेतील पदवी या शैक्षणिक अर्हता समकक्ष म्हणून ग्राहय धरण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास करण्यात आली आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक संस्था यांच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात रकाना क्र.४ मध्ये दर्शविलेल्या शैक्षणिक अर्हता या महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांच्या अधिनस्त कार्यरत संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब व वैज्ञानिक सहायक, गट-क या पदांच्या रकाना क्र.३ मध्ये दर्शविलेल्या सध्याच्या सेवाप्रवेश नियमातील शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून ग्राहय धरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदांचे नाव | सध्याच्या सेवाप्रवेश नियमात विहीत केलेली शैक्षणिक अर्हता | सध्याच्या शैक्षणिक अर्हतेस समकक्ष म्हणून प्रस्तावित शैक्षणिक अर्हता |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | **सहायक रासायनिक विश्लेषक, गट-ब** | Possess a Post Graduate degree in at least the Second Class in any branch of Chemistry or Bio-Chemistry of a recognised university | Possess a Post Graduate degree in at least the Second Class in any branch of Forensic Science of a recognised University |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | **वैज्ञानिक सहायक, गट-क** | Possess a degree of a Statutory University in Science at least the Second Class with Chemistry | Possess a degree of a Statutory University in Science at least the Second Class with Forensic Science. |

२. प्रस्तुत शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.संकिर्ण-२०१७/(८८/१७)-मशि १, दि.२५.४.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२८१७३९०५८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath V Potare

Digitally signed by Somnath V Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, cn=Somnath V Potare
Date: 2017.04.28 18:17:36 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
४) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई
५) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक संस्था, मुंबई/औरंगाबाद/नागपूर
६) उपसंचालक,प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/पुणे/कोल्हापूर/औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/नांदेड
७) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
८) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग यांचे स्वीय सहायक
९) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे स्वीय सहायक
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखा अधिकारी, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/कोल्हापूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/नांदेड
१२) निवडनस्ती, गृह विभाग/पोल-४.